सन २००८ मध्ये राज ठाकरे यांचे अटकेच्यावेळी अधिग्रहित करण्यात आलेल्या एस.टी. बसेसच्या भाडे खर्चास मंजुरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग (विशेष)

शासन निर्णय क्र. संकीर्ण ११०९/प्र.क्र.३९५/विशा १अ
मंत्रालय, मुंबई-३२, दि. २१ ऑक्टोबर, २०११.

**वाचा** :- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दि. ११/०७/२०११ चे पत्र क्र. पोमसं/३०/३५७७/रत्नागिरी/५०/२००९.

**शासन निर्णय** :- रत्नागिरी येथे मनसे प्रमुख श्री. राज ठाकरे यांच्या अटकेच्या वेळी निर्माण झालेल्या कायदा व सुव्यवस्था बंदोबस्तासाठी, घाटकोपर येथून गेलेल्या पोलीस कर्मचाऱ्यांना परत घाटकोपर येथे पाठविण्याकामी दि. २१/१०/०८ ते दि. २८/१०/०८ या कालावधीत रत्नागिरी एस.टी. आगारातील दोन एस.टी. बसेस अधिग्रहित करण्यात आल्या होत्या. सदर बसेसचे भाडे अदा करण्यासाठी येणाऱ्या रु.४७,७०८/- (रुपये सत्तेचाळीस हजार सातशे आठ फक्त) खर्चास शासन मंजुरी देण्यात येत आहे. तसेच यासाठीचा खर्च करण्यास पोलीस अधिक्षक, रत्नागिरी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२. याबाबतचा खर्च "मुख्य लेखाशिर्ष २०५५" पोलीस-१०९, जिल्हा पोलीस-(००)(०१)-जिल्हा पोलीस बल इतर खर्च, याखाली खर्ची टाकावा व मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हे आदेश वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला उपविभाग २ मधील अनुक्रमांक १३ नियम ६० व ६१ (अ) (२) अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक 201110211121254001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सु. सु. वाहाणे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

प्रति,

प्रधान लेखापाल-१/२ (लेखा परिक्षक/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
विशेष पोलीस महानिरीक्षक, कोकण परिक्षेत्र, कोकण भवन, नवी मुंबई.
जिल्हाधिकारी, रत्नागरी,
पोलीस अधिक्षक, रत्नागिरी,
आगार व्यवस्थापक, राज्य परिवहन, रत्नागिरी आगार, रत्नागिरी.
निवडनस्ती, विशा-१अ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.